**जिल्हा शल्यचिकित्सक रूग्णालय व उपजिल्हा रुग्णालये येथील SCNU ऑपरेशन थिएटर करीता १० KVY ३ Phase Online UPS उपकरणांच्या खरेदीसाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता लेखाशिर्ष-२२१० १०६२, ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री खरेदीकरिता विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाअ-२०२४/प्र.क्र१३६/आरोग्य-३**
१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३१ मार्च, २०२५

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-२०२४/प्र.क्र.१३९/आरोग्य-३, दिनांक २०.०६.२०२४.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४
३) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे यांचे पत्र जा.क्र.आसेप/कक्ष-११७/अनुदान/न.क्र.६०/२७२८-३१/२०२५, दिनांक २४.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे यांनी जिल्हा शल्यचिकित्सक रूग्णालय व उपजिल्हा रुग्णालये येथील SCNU ऑपरेशन थिएटर करीता १० KVY ३ Phase Online UPS उपकरणांच्या खरेदीसाठी सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता लेखाशिर्ष-२२१० १०६२, ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री या उद्दीष्टांतर्गत खरेदीकरिता संदर्भीय दिनांक २०.०६.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली.
यासाठी विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन) पुणे यांनी या विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा शल्यचिकित्सक रूग्णालय व उपजिल्हा रुग्णालये येथील SCNU ऑपरेशन थिएटर करीता १० KVY ३ Phase Online UPS उपकरणांच्या खरेदीकरता विधानमंडळाच्या द्वितीय (पावसाळी) अधिवेशन २०२४ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला निधी रु.३,४३,६४,०००/- (रु. तीन कोटी त्रेचाळीस लक्ष चौंसष्ठ हजार फक्त) वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार विहित कार्यपध्द्तीने खर्च करण्यात येईल या अटीच्या अधिन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर बाब नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची व संनियंत्रण करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई व यांची राहील.

०३. सदर निधी विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यात येईल तसेच योग्य रितीने अदायगी करण्यात येईल याबाबतची जबाबदारी उपसंचालक,आरोग्य सेवा, (परिवहन), पुणे यांची राहिल.

०४. सदर खर्च मागणी क्र. आर-१, २२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (००१) संचालन व प्रशासन, ८००-इतर खर्च, उपशिर्ष-००१ (०१) (११) सार्वजनिक आरोग्य व वैद्यकीय सेवा साधनसामग्री,परिक्षण व दुरुस्ती पथक (२२१० १०६२), अंतर्गत ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. या उद्दीष्टांतर्गत मंजूर झालेला निधी संवितरीत करण्यासाठी "प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, (परिवहन) पुणे हे "आहरण संवितरण अधिकारी" आणि "उपसंचालक, आरोग्य सेवा, (परिवहन) पुणे)" हे "नियंत्रण अधिकारी" राहतील.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३३७/२०२५/व्यय-१३ दि.३१.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३११५३७४६०११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR
Date: 2025.03.31 17:48:25 +05'30'

**(सं . द. महाडेश्वर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
७) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१०) निवडनस्ती (आरोग्य-३)